| | |
|---|---|
| | **अनुसूचित जातीच्या मुला-मुलींना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्याबाबत** |

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक-२,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ११ जून ,२००३.**

**प्रस्तावना -** अनुसूचित जातीच्या विदयार्थ्यांना आर्थिक परिस्थितीमुळे उच्च शिक्षणासाठी परदेशातील नामांकित विदयापीठामध्ये प्रवेश घेता येत नाही. विदयार्थ्यांची गुणवत्ता असूनही केवळ आर्थिक परिस्थितीमुळे त्यांना उच्च शिक्षणापासून वंचीत राहावे लागते. अनुसूचित जातीच्या विदयार्थ्यांना परदेशात शिक्षणाची संधी मिळावी व त्यांच्या गुणवत्तेला वाव मिळावा म्हणून विविध विषयामध्ये परदेशातील नामांकित विदयापीठा मध्ये ज्या विदयार्थ्यांना प्रवेश मिळेल अशा १० विदयार्थ्यांचा परदेशातील शिक्षणाचा खर्च करण्याची बाब शासनाच्या शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -** याबाबत साकल्याने विचार करुन शासन आता असा निर्णय घेत आहे की, सोबतच्या परिशिष्ट -अ मध्ये नमूद केलेल्या शिष्यवृत्ती नियमावली प्रमाणे सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षा पासून अनुसूचित जातीच्या विदयार्थ्यांना परदेशामध्ये उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, व इतर मागासवर्गीयांचे कल्याण- ०१, अनुसूचित जातीचे कल्याण - २७७ शिक्षण, पंचवार्षिक वार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (विघयो) (०४) (१८) राजर्षी शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार (२२२५-३२६-२) - ४०- शिष्यवृत्त्या/ विदयावेतने " या अर्थशिर्षा खाली खर्ची घालून प्रतिवर्षी त्यासाठी करण्यांत येणाऱ्या मंजूर तरतूदी मधून भागविण्यांत यावा.

३. सन २००३-२००४ या वर्षा करिता येणारा खर्च वरील परिच्छेद- २ मध्ये नमूद केलेल्य लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यांत यावा. याबाबत संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरणं व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६५/०३/व्यय - १४, दिनांक २९ मे, २००३ अन्वये निर्गमीत करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(नं. मा. शिलवंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति
मा.राज्यपालांचे सचिव

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सचिव, शालेय शिक्षण विभाग.
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, म.रा.,मुंबई (प्रसिध्दीसाठी)
संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाज कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व समाज कल्याण अधिकारी, गट - अ, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
सर्व कोषागार अधिकारी.
निवड नस्ती , मावक - २

## परिशिष्ट-अ

शासन निर्णय क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक-२,दिनांक ११ जुन,२००३.चे सहपत्र.

## शिष्यवृत्ती योजनेची नियमावली.

१ राज्यातील सर्व विभागातील विद्यार्थ्यांना समान संधी देण्याच्या उद्देशाने शालेय शिक्षण परीक्षा मंडळास, प्रत्येक मंडळास एक याप्रमाणे ८ मंडळास ८ शिष्यवृत्त्या देण्यात येतील आणि राज्यातून दोन विद्यार्थ्यांना पदव्युत्तर शिष्यवृत्ती देण्यात येइल. अशाप्रकारे या योजने अंतर्गत अनुसुचित जातीच्या फक्त १० विदयार्थ्यांना दरवर्षी शिष्यवृत्ती देण्यात येईल. या १० विद्यार्थ्यांपैकी ८ विद्यार्थ्यांना पदवी कोर्ससाठी आणि २ विद्यार्थ्यांना पदव्युत्तर कोर्ससाठी शिष्यवृत्ती देण्यात येईल. १० विद्यार्थ्यांपेक्षा जास्त विद्यार्थ्यांचे अर्ज प्राप्त झाले तर त्या विद्यार्थ्यांना त्यांनी १२ वीत मिळविलेल्या गुणांप्रमाणे प्राधान्य देण्यात येईल. एखाद्या परीक्षा मंडळातून जर त्यावर्षी पात्र विद्यार्थी उपलब्ध झाला नाहीतर त्या विभागाचा त्या वर्षाचा अनुशेष गृहीत धरुन पुढील वर्षी त्या प्रमाणात वाढीव शिष्यवृत्ती त्या विभागास देण्यात येईल.

२ विद्यार्थी महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असावा.

३ विदयार्थी महाराष्ट्रातील अनुसूचित जातीचा असावा.

४ या शिष्यवृत्ती साठी विदयार्थ्याचे वय जास्तीत जास्त ३५ वर्षा पर्यन्त असावे.

५ विदयार्थ्याला परदेशातील विदयापीठामध्ये प्रवेश मिळालेला असावा.

६ या शिष्यवृत्तीसाठी संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे अर्ज करणे आवश्यक आहे.

७ या शिष्यवृत्तीसाठी अर्जासोबत खालील कागदपत्रे जोडणे आवश्यक आहे.
- अ. जातीचा दाखला.
- ब. उत्पन्नाचा दाखला.
- क. परदेशातील विदयापीठामध्ये प्रवेश मिळाल्या बाबतचे त्या विदयापीठाचे पत्र व संबधीत विद्यापीठाच्या प्रॉस्पेक्टसची प्रत.
- ड. राज्य सरकार किंवा केंद्र सरकारच्या दोन राजपत्रित अधिकाऱ्यांचे शिफारस पत्र (References).
- इ. विद्यार्थ्याने शैक्षणिक शुल्कासह येणाऱ्या एकूण खर्चाचे अंदाजपत्रक द्यावे.

८ या शिष्यवृत्तीसाठी प्राप्त झालेल्या अर्जाची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती राहील.

| | | |
|---|---|---|
| १. प्रधान सचिव / सचिव (सामाजिक न्याय विभाग) | --- | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव / सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) | --- | सदस्य |
| ३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | --- | सदस्य |
| ४. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | --- | सदस्य |
| ५. संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | --- | सदस्य सचिव |

९ या योजने अंतर्गत शिष्यवृत्ती मिळण्यासाठी संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे स्थानिक व इतर प्रमुख वर्तमानपत्रांमध्ये जाहिरात देवून अर्ज प्राप्त करुन घेतील. जाहिरातीनुसार प्राप्त झालेले अर्ज संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य्, पुणे यांनी वर नमूद केलेल्या समितीपुढे सादर करावेत. विदयार्थ्यांनी केलेल्या अर्जाबाबत प्रत्यक्ष छाननी करण्यासाठी समितीने विदयार्थ्याची मुलाखत आयोजित करावी आणि त्यातून निकषानुसार १० विदयार्थ्याची निवड करावी.

१० या शिष्यवृत्तीसाठी विदयार्थ्याच्या पालकाची उत्पन्नाची मर्यादा वार्षिक जास्तीत जास्त रु.२.५० लक्ष ( रु.

दोन लाख पन्नास हजार फक्त) पर्यन्त राहील.

११ ज्या विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यांत येईल, त्यामध्ये पहिल्या वर्षी शिक्षण फी संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत थेट संबंधित विदयापीठास अदा करण्यांत येईल. आणि निर्वाहभत्ता दरवर्षी त्या शिक्षण संस्थेने ठरवून दिल्याप्रमाणे किंवा भारत सरकारच्या Department of personnel & Training विभागाने विदेशी शिष्यवृत्तीसाठी ठरवून दिलेल्या दराप्रमाणे येणारा खर्च या सर्व बाबींचा विचार करुन संचालक, समाज कल्याण देय होणारा निर्वाह भत्ता मंजूर करतील. दुसऱ्या वर्षी विदयार्थ्याने ज्या विदयापीठामध्ये प्रवेश घेतला आहे त्या विदयापीठाच्या विदयार्थ्याच्या प्रगती व उपस्थिती बाबतच्या प्रमाणपत्रानंतर अदा करण्यांत येईल. याबाबत संचालक,स.क. यांना जरुर वाटल्यास भारतीय दुतावास किंवा इतर माध्यमातून ते माहिती मागवतील.

१२ ही योजना या स्वरुपात सन २००३-२००४ या वर्षासाठी लागू राहील. या योजनेच्या स्वरुपात पुढील वर्षा पासून आवश्यकतेनुसार योग्य ते बदल करण्यांत येतील.

१३ विदयार्थ्याने अभ्यासक्रम अर्धवट सोडल्यास अभ्यासक्रमासाठी शासनामार्फत खर्च करण्यांत आलेली संपूर्ण रक्कम त्याच्याकडून वसूल करण्यांत येईल.

१४ विदयार्थ्याने शिक्षणानंतर नोकरी मिळाल्यानंतर त्यांच्या साठी शासनामार्फत खर्च करण्यांत आलेल्या रक्कमेपैकी त्यांच्या स्वेच्छेने कमीत कमी १०% रक्कम पाच वर्षामध्ये शासनामार्फत स्थापन करण्यांत आलेल्या सामाजिक न्याय निधी मध्ये जमा करावी अशी अपेक्षा आहे.

१५ जाहिरात, प्रसिध्दी,स्टेशनरी व इतर खचासाठी या योजनेंतर्गत केलेल्या तरतूदीतून प्रत्येक विभागासाठी रु.१.०० लाख व राज्यपातळीवर रु.२.०० लाख याप्रमाणे एकूण रु.१०.०० लाख ठेवण्यात येत आहेत.

१६ सन २००३-०४ या वर्षी जर विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास यापूर्वी ज्यांना परदेशातील संस्थेत प्रवेश मिळाला आहे ते विद्यार्थी या योजनेअंतर्गत पात्र राहतील.